प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाचा सर्वसाधारण प्रवर्गाचा सन २०१९-२० चा अखर्चित निधी पुनर्जिवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता दिलेल्या निधीपैकी उर्वरित निधी रु.९९.७१ कोटी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०५२०/प्र.क.५३/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख : २७ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ:-

१. कृषी, सहकार व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग भारत सरकार यांचे पत्र क्र.७-३/२०२०- आरएफएस-III, दि.१५ एप्रिल, २०२०.
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जाक्र/कृआ/फलो-४/निधी/४४४/२०२०, दि. ४ सप्टेंबर, २०२०.
३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.प्रकृसिं-०५१९/प्र.क्र.५३/१४-अे, दि-११ जुन, २०२०

प्रस्तावना-

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाची राज्यात सन २०१५-१६ पासून अंमलबजावणी करण्यात येत आहे. या घटकांतर्गत केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे. सदर घटकाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने सन २०१९-२० या वर्षात रु.३२५ कोटी एवढा केंद्र हिश्श्याचा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी दि. १ एप्रिल, २०२० रोजी अखर्चित असलेला निधी सन २०२०-२१ या वर्षात खर्च करण्यास, केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ येथील दि.१५ एप्रिल, २०२० च्या पत्रान्वये मान्यता दिलेली आहे.

सन २०१९-२० या वर्षात उपलब्ध झालेल्या केंद्र हिश्श्याच्या निधीपैकी अखर्चित निधीमध्ये सर्वसाधारण प्रवर्गाच्या रु.११८.९९ कोटी एवढया रकमेचा समावेश आहे. सदर निधी शासन कोषागारात जमा आहे. वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनूसार सदर निधीपैकी रु.६० कोटी व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.४० कोटी असा एकूण रु.१०० कोटी निधी संदर्भाधीन दि. ११ जून, २०२० च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित केंद्र हिश्श्याचा रु. ५९.८३ कोटी व त्यास समरुप राज्य हिश्श्याचा रु.३९.८८ कोटी असा एकूण रु.९९.७१ कोटी

निधी आयुक्त, कृषी यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

१. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाचा सन २०१९-२० या वर्षातील, केंद्र हिश्श्याचा सर्वसाधारण प्रवर्गाचा अखर्चित निधी रु. ५९.८३ कोटी (अक्षरी रुपये एकोणसाठ कोटी त्र्याऐंशी लक्ष फक्त) व त्यास समरुप राज्य हिश्श्याचा रु. ३९.८८ कोटी (अक्षरी रुपये एकोणचाळीस कोटी अठ्ठ्याऐंशी लक्ष फक्त) असा एकुण रु. ९९.७१ कोटी (अक्षरी रुपये नव्याण्णव कोटी एकाहत्तर लक्ष फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी प्रथम सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्यासाठी वापरण्यात यावा व निधी शिल्लक राहिल्यास उपलब्ध निधीच्या मर्यादेत नवीन प्रस्तावाना पुर्वसंमती देऊन निकाली काढण्यात यावेत.

३. सदर निधी खालील लेखाशिर्षाखालील चालु वर्षाच्या मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(०७) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन)<br>(केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१ २५०४) ३३, अर्थसहाय्य. | मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(२१) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन)<br>(राज्य हिस्सा ४०%)<br>(२४०१ ए९९६) ३३, अर्थसहाय्य. |

४. अनुदानाची रक्कम PFMS प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

५. सदर योजनेंतर्गत वितरीत करण्यात येणाऱ्या निधीच्या आहरण व संवितरणासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे-:

| अ.क्र | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे |
| २. | जिल्हास्तर | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

६. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

७. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ- २२३/२०२०/व्यय-१, दि. २३ ऑक्टोबर, २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२७१७१७०८७७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0ffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.10.27 17:18:58 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय,पुणे
३. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
६. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)

७. सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हा परिषद)
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
९. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग (का-१४३१)/मंत्रालय, मुंबई-३२
१३. वित्त विभाग ( व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ )/ मंत्रालय, मुंबई-३२
१४. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१५. मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१६. निवड नस्ती (कार्यासन -१४अे).